

GR-200408031653360001-1210 69/5

इंदिरा आवास योजना

भूकंपापासून संरक्षीत घरे बांधण्याबाबत

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास व जलसंधारण विभाग.
शासन परिपत्रक क्र. जरोयो १०९३/प्र.५८/जल-१७
मंत्रालय, मुंबई - ३२.
दिनांक - २६ नोव्हेंबर, १९९३.

शासन परिपत्रक - दिनांक १४.१०.१९९३ रोजी मंत्रीमंडळ बैठकीमध्ये मराठवाड्यातील भूकंपग्रस्ताच्या पुनर्वसनासंबंधात खालील निर्णय घेण्यात आला आहे.

"यापुढे महाराष्ट्र राज्यात नव्याने बांधावयाची घरे ही भूकंपापासून संरक्षित असतील याची खात्री इमारती बांधण्यासाठी, अंतिम परवानगी देताना ग्राम विकास विभागाने, नगर विकास विभागाने घ्यावयास हवी व अशाच घरांना बांधण्याची अंतिम अनुमती द्यावी.."

३. जवाहर रोजगार योजनेअंतर्गत इंदिरा आवास योजनेखाली मोठ्या प्रमाणावर दरवर्षी घरे बांधली जातात. १९९३-९४ पासून इंदिरा आवास योजनेखाली बांधावयाची घरे भूकंपापासून संरक्षित असतील याची खात्री तांत्रिक व प्रशासकीय मंजूरीपूर्वी सर्व संबंधितांनी दक्षता घेणे xxव अत्यावश्यक आहे.

४. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद व प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा यांनी जिल्हास्तरावर केंद्र शासनाने बांधकामाकरिता विहित निकष विचारात घेऊन नमुना अंदाजपत्रक व नकाशे तयार करावीत व सर्व संबंधितांना पाठवावी. प्रत्यक्ष बांधणीच्या वेळी लाभार्थीशी सल्लामसलती करुन बदल करण्यास हरकत नाही. अशा नमुना अंदाजपत्रक व नकाशाची एक प्रत शासनाकडे पाठवावी.

५. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांनी हे परिपत्रक सर्व संबंधितांच्या त्वरित नजरेस आणावे व त्याची अंमलबजावणी काटेकोरपणे होते की नाही याची दक्षता घ्यावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

[ र. बा. सावंत ]
शासनाचे उपसचिव